अपारंपारिक ऊर्जा निर्मिती धोरण-२०२० अंतर्गत प्रकल्प आस्थापित करताना प्रकल्पधारकांच्या अडीअडचणी सोडविण्याकरीता समिती गठीत करणे...

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : अपाऊ-२०२०/प्र.क्र.१३७/भाग-१७/ऊर्जा-७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १३ डिसेंबर, २०२१.

संदर्भ : शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग, क्र.अपाऊ-२०२०/प्र.क्र.१३७/उर्जा-७, दिनांक ३१/१२/२०२०

**प्रस्तावना :-**

अपारंपारिक ऊर्जा निर्मिती धोरण-२०२० भाग-१ अन्वये राज्याचे नवीन व नवीकरणीय (अपारंपारिक) ऊर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मितीच्या पारेषण संलग्न प्रकल्पांसाठी एकत्रित धोरण-२०२० व भाग-२ अन्वये राज्याचे नवीन व नवीकरणीय (अपारंपारिक) ऊर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मितीच्या पारेषण विरहीत प्रकल्पांसाठी एकत्रित धोरण-२०२० संदर्भिय शासन निर्णयाद्वारे जाहीर करण्यात आले आहे. सदर धोरणांतर्गत प्रकल्प आस्थापित करताना प्रकल्पधारकांच्या अडीअडचणी सोडविण्याकरीता ऊर्जा सचिवांच्या अध्यक्षतेखाली संबंधित विभागांच्या प्रतिनिधीची सुकाणू समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

अपारंपारिक ऊर्जा निर्मिती धोरण-२०२० अंतर्गत प्रकल्प आस्थापित करताना प्रकल्प धारकांच्या अडीअडचणी सोडविण्याकरीता सुकाणू समिती गठीत करण्यात येत आहे. सदर समितीचे सदस्य पुढीलप्रमाणे राहतील :-

| | |
|---|---|
| प्रधान सचिव (ऊर्जा) | अध्यक्ष |
| अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महावितरण कंपनी | सदस्य |
| अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महापारेषण कंपनी | सदस्य |
| अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महानिर्मिती कंपनी | सदस्य |
| सल्लागार, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी मर्यादित | सदस्य |
| महासंचालक, महाऊर्जा | सदस्य सचिव |

सदर समितीमध्ये सह सचिव/उप सचिव, कृषी विभाग/महसूल विभाग/वन विभाग/पर्यावरण विभाग/उद्योग उपविभाग/जलसंपदा विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग/जलसंधारण विभाग/पाणीपुरवठा विभाग/ग्राम विकास विभाग/सहकार व पणन विभाग यांना आवश्यकतेनुसार धोरणाच्या अनुषंगाने संबंधितांना निमंत्रित सदस्य म्हणून सहभागी करुन घेता येईल.

**समितीची कार्यकक्षा :-**

अपारंपारिक ऊर्जा निर्मिती धोरण-२०२० अंतर्गत २५ मेगावॅट पेक्षा जास्त क्षमतेच्या अपारंपारिक ऊर्जा स्त्रोतांचे प्रकल्प आस्थापित करतांना अशा प्रकल्पधारकांना येणा-या अडीअडचणी सोडविण्यासाठी / दूर करण्यासाठी आवश्यकतेनुसार संबंधित विभागांच्या प्रतिनिधींशी समन्वय साधून सदर समिती कार्य करेल.

असे अपारंपारीक ऊर्जा स्त्रोतांचे प्रकल्पधारक आपल्या अडी-अडचणी सोडविण्यासाठी आवश्यकतेनुसार या सुकाणू समितीशी संपर्क साधतील.

**समितीचा कार्यकाळ:-**

सदर समिती अपारंपारिक ऊर्जा निर्मिती धोरण-२०२० हे लागू असेपर्यंत अस्तित्वात राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११२१३१३१०४४२१० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2021.12.13 13:13:07 +05'30'

**( ना.रा. ढाणे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधान भवन मुंबई,
५) सर्व मंत्री / सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मुंबई,
६) मा.मंत्री, (ऊर्जा, नवीन व नवीकरणीय ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) मा.राज्यमंत्री, (ऊर्जा, नवीन व नवीकरणीय ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८) सर्व विधानमंडळ सदस्य,विधान भवन, मुंबई,
९) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
१०) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी,
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,

१७) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१९) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधारी कंपनी मर्या.,मुंबई,
२१) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
२२) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२३) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२४) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
२५) उप सचिव/ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६) ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२७) मुख्य विद्युत निरिक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८) निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.